जनगणना विभागीय तक्ते कार्यालयातील
कमी केलेल्या कर्मचा-यांना पर्यायी
नोक-या देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक-एईएम-१०८१/३४८७/सोआर-७२-१६अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ४ मार्च १९८२.

## शासन निर्णय

सन १९८१ च्या जनगणनेच्या कार्याच्या संदर्भात जनगणना विभागीय तक्ते कार्यालयात [ Regional Tabulation Offices ] काम केलेल्या कर्मचा-यांनी त्यांच्या सेवा संपुष्टात आल्यानंतर पर्यायी नोकरी देण्याबाबत शासनाकडे विनंती केली होती. या विनंतीबाबत काळजीपूर्वक विचार करुन शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे :-

(१) जनगणना कार्यालयात काम केल्यानंतर सेवामुक्त करण्यात आलेल्या वा यापुढे सेवामुक्त करण्यात येणा-या कर्मचा-यांना एक सवलत म्हणून वर्ग ३ मधील पदांवर, त्यांचे शिक्षण, वय इत्यादी बाबतच्या अटी पूर्ण होत असल्यास सेवकालीन व्यक्तींच्या नंतरच्या पसंतीक्रमाने अल्पकालिक तात्पुरती नियुक्ती देण्यात यावी.

(२) त्याचप्रमाणे वर्ग ४ वरील पदांवर, शिक्षण, वय, इत्यादी अटी पूर्ण असल्यास सेवकालीक व्यक्तींच्यानंतरच्या पसंतीक्रमाने नियुक्ती देण्यात यावी.

(३) शासकीय कार्यालयातील वर्ग ३ मधील जी पदे प्रादेशिक निवडमंडळामार्फत भरण्यात येतात अशा पदांवर नियुक्त्या करतांना कमाल वयोमर्यादेसाठी जनगणना कार्यालयांतील सेवेच्या मुदती एवढा कालावधी शिथिल करण्यात यावा. तसेच वर्ग ४ मधील पदावर नियुक्तीसाठीही वरीलप्रमाणे जनगणना कार्यालयातील सेवेच्या मुदतीएवढा कालावधी कमाल वयोमर्यादेसाठी शिथिल करावा.

२. मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील असलेले सार्वजनिक उपक्रम महामंडळे, इत्यादींनी त्यांच्या उपक्रमातील वर्ग ३ व वर्ग ४ मधील पदे भरतांना जनगणना कार्यालयातून सेवामुक्त होणा-या कर्मचा-यांना वरीलप्रमाणे सवलती याव्यात अशी त्यांना विनंती करावी.

३. वरीलप्रमाणे पर्यायी नोकरीची सवलत मिळविण्यासाठी जनगणना कार्यालयातून सेवामुक्त होणा-या कर्मचा-यांनी सेवायोजन कार्यालयात त्यांचे नाव नोंदविणे आवश्यक आहे. सेवायोजन कार्यालयांनी अशा कर्मचा-यांची नांवे नोंदवितांना त्यांनी जनगणना कार्यालयात काम केल्याची नोंद घ्यावी. त्याचप्रमाणे सेवायोजन कार्यालयाने त्यांच्याकडे आलेल्या मागणीपत्रकानुसार उमेदवार पाठवितांना अशा कर्मचा-यांची वरील पसंतीक्रमानुसार शिफारस करावी.

कृ. मा. प.

४. जनगणना संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी सेवामुक्त केलेल्या कर्मचा-यांची नांवे सेवायोजन संचालक, मुंबई, संबंधित जिल्हाधिकारी, त्याचप्रमाणे विविध जिल्ह्यांतील सेवायोजन कार्यालये यांच्याकडे अशा कर्मचा-यांना पर्यायी नोकरी देण्यासाठी सत्वर पाठवावी. तसेच प्रादेशिक निवड मंडळातर्फे ज्या ज्यावेळी वर्ग ३ मधील पदांसाठी जाहिराती देण्यांत येतील त्या त्यावेळी अशा कर्मचा-यांनी अर्ज करावेत अशा सूचना सेवामुक्त केलेल्या वा करण्यात येणा-या कर्मचा-यांना द्याव्यात.

५. बृहन्मुंबई व्यतिरिक्त जिल्ह्यातील वर्ग ३ मधील पदे प्रादेशिक निवड मंडळाच्या कक्षेत येत असल्यामुळे अशा पदांवर तात्पुरत्या नियुक्त्या जास्तीत जास्त १ वर्षाच्या कालावधीसाठी करण्यात येतात. तेव्हा जनगणना कार्यालयातील ज्या कर्मचा-यांना तात्पुरत्या नियुक्त्या देण्यात येतील त्यांची एक वर्षाचे मुदतीत प्रादेशिक निवड मंडळातर्फे अशा पदासाठी निवड होणे आवश्यक आहे. अन्यथा त्यांच्या तात्पुरत्या नियुक्त्या समाप्त होतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

श. चा. उंडे,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
सर्व मंत्रालयीन विभाग,
संचालक, जनगणना संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, सेवायोजन संचालनालय, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/
कार्यालय प्रमुख,
महालेखापाल, महाराष्ट्र [१], मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र [२], नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागामधील कार्यासन क्रमांक १२, १३-अ, १४-अ, १६-ब,
निवड फाईल.

---

एच-१३२३[४५००-३-८२]